**यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे पुणे येथील विभागीय केंद्र इमारतींचे बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. बैठक-२०२१/प्र.क्र.३६/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २५ नोव्हेंबर, २०२१.

वाचा :- १) कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे दि.०३.११.२०२१ रोजीचे पत्र.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.२०.०९.२०१९

**प्रस्तावना :-**

यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक विद्यापीठाची स्थापना महाराष्ट्र विधी मंडळ कायदा क्र.२० अन्वये दि.०१.०७.१९८९ रोजी झाली आहे. विद्यापीठ अनुदान आयोगाची मान्यता असलेल्या या विद्यापीठाचे कार्यक्षेत्र संपूर्ण महाराष्ट्र राज्य आहे. महाराष्ट्रात या विद्यापीठाची अमरावती, नागपूर, औरंगाबाद, मुंबई, नाशिक, पुणे, कोल्हापूर व नांदेड असे ८ विभागीय केंद्र कार्यरत आहेत. विद्यापीठाच्या ८ विभागीय केंद्रामार्फत १६०० अभ्यासकेंद्रावर नियंत्रण ठेवले जाते. विद्यापीठाची जवळपास ६ लक्ष इतकी विद्यार्थी संख्या आहे. पुणे विभागीय केंद्रातंर्गत पुणे, सातारा व सोलापूर येथे अनुक्रमे १६०, ३६ व ७१ अशी एकूण २६७ अभ्यासकेंद्र असून, या अभ्यासकेंद्रावर एकूण १ लक्षपर्यंत विद्यार्थी प्रवेश घेतात.

सद्यस्थितीत पुणे विभागीय केंद्राचा कारभार पुणे महानगरपालिकेच्या अंतर्गत असलेल्या शाहीर अण्णाभाऊ साठे प्रशाला गृह येथून चालविला जात असून सदरची जागा महानगरपालकिने भाडेत्तवावर तात्पुरत्या स्वरुपावर दिलेली आहे. सदरची जागा वाढती विद्यार्थी संख्या व अभ्यासकेंद्रे यांना सेवा देण्याच्या दृष्टीने पुरेशी नसल्याने बालेवाडी पुणे येथे सर्व्हे नं.४२/११, १२, १८ येथे ३४७५ चौ.मी ४९ व सर्वे नं.४२/२०, २१ येथे १०७७.२८ चौ.मी. असे दोन्ही प्लॉट मिळून एकूण ४५५२.७७ चौ.मी. जागा सफायर पार्कसमोरबालेवाडी, अमित एन्टरप्राईजेस, पुणे या ठिकाणी भाडेपट्टा कराराने ३० वर्षाकरीता आवश्यक रक्कम अदा करुन दि.०१.०८.२०१३ रोजी उपआयुक्त. भुसंपादन व व्यवस्थापन, पुणे यांचेकडील ताबा पावती नूसार प्राप्त झालेली आहे. प्राप्त झालेल्या जागेवर इमारत बांधकाम करण्यासाठी रु.११८५.३१ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास मान्यता देण्याची विनंती केली होती.

तद्नुषंगाने पुणे विभागीय केंद्र या इमारतींच्या बांधकामाची किंमत रु.१५ कोटीच्या मर्यादित असल्याने संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार पुणे येथील विभागीय केंद्राच्या इमारत बांधकामाकरीता रु.११८५.३१ लक्ष किंमतीचे अंदाजपत्रकास (Recapitulation Sheet) मुख्य अभियंता, पुणे यांनी तांत्रिक सहमती दिल्यानुसार सदर बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

बालेवाडी पुणे येथे यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे पुणे विभागीय केंद्राच्या इमारतींच्या बांधकामास तक्ता "अ" मध्ये नमूद केलेल्या रु.११८५.३१ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास

(Recapitulation Sheet) मुख्य अभियंता, पुणे यांनी सहमती दर्शविल्यानुसार खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१. विद्यापीठाच्या प्राधिकरणाची आवश्यक ती मान्यता घेण्यात यावी.

२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घ्यावी.

४. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबीच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक.२०१७/प्र.क्र.११/ नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

५. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करून सदर कामे पूर्ण करावीत.

८. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करून द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

९. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.२०.०९.२०१९ तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक-संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५ सप्टेंबर, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११२६१६३७४९७००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.11.26 16:39:35 +05'30'

**( अ. म. बाविस्कर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

२) कुलगुरू, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक

३) कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
५) सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे/ औरंगाबाद.
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ नाशिक.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नाशिक.
१०) नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-३)/(व्यय-५) मंत्रालय, मुंबई.
१२) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३) मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४) मा.प्रधान सचिव. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.